**सन २००९-१० ते सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता वितरीत करण्यात आलेली जुनी संगणक हार्डवेअर सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन हार्डवेअर सामुग्री खरेदी करण्याकरिता रु. ५.०० कोटी इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. संप्रिसा -२०१६/प्र.क्र.४६/का.०७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ३१ जानेवारी, २०१९.

वाचा :- १) मा.मुख्यमंत्री व मा.मुख्य न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक १८.४.२०१६ रोजी झालेल्या संयुक्त बैठकीचे इतिवृत्त.

२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई यांची दिनांक १४.१०.२०१४, १८.१२.२०१५ व २०.०१.२०१६ ची पत्रं.

३) नियोजन विभाग, अर्धशासकीय पत्र क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.८४/का.१४११, दिनांक ६.७.२०१६.

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक २०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३, दिनांक १२.८.२०१६.

५) शासन ज्ञापन समक्रमांक दिनांक २४.०३.२०१७ व ३१.०३.२०१७

६) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र.Spl./Comp./७२७/२०१८, दिनांक २०.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी ई प्रकल्प समिती, मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचेकडून सन २००९-१०, सन २०११-१२ या वित्तीय वर्षाकरिता मा.उच्च न्यायालय, मुंबई तसेच जिल्हा व सत्र न्यायालयांना वितरीत करण्यात आलेल्या विहित संगणक हार्डवेअर सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन संगणक सामुग्री उपलब्ध करण्याकरिता येणाऱ्या रु. ४१,४४,५२,६८६.६८/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास मा.मुख्यमंत्री व मा.मुख्य न्यायमूर्ती, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या दिनांक

१८.०४.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत सहमती दर्शविण्यात आलेली होती. त्यानुसार मा. उच्च न्यायालयास यापूर्वी संदर्भ क्र. ५ अन्वये रु. १६.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला होता. दिनांक १८.०४.२०१६ बैठकीनुसार रु. ४१,४४,५२,६८६.६८/- इतक्या रकमेपैकी उर्वरित रक्कम रु. २५.०० कोटी उपलब्ध करुन देण्याची विनंती संदर्भ क्र. ६ अन्वये मा. उच्च न्यायालयाने केली होती. मा. उच्च न्यायालयाच्या विनंतीनुसार कालमर्यादा संपलेली संगणक हार्डवेअर सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन संगणक सामुग्री उपलब्ध करण्याकरिताच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा.उच्च न्यायालय, मुंबई तसेच जिल्हा व सत्र न्यायालयांना वितरीत करण्यात आलेली संगणक हार्डवेअर सामुग्री निर्लेखित करुन त्याबदल्यात नवीन संगणक सामुग्री उपलब्ध करुन देण्याच्या खरेदी प्रस्तावाकरितारु. ५.०० कोटी इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. माहिती तंत्रज्ञान संचालनालयाच्या सूचनेनुसार अंतिम करण्यात आलेल्या पुढील Specifications प्रमाणे रु. ५.०० कोटी इतक्या रकमेच्या मर्यादेत शक्य होईल तितकी हार्डवेअर सामुग्री शासनाच्या विहित धोरणानुसार खरेदी करण्यात यावी.

**Specifications of Computer**

| **Particular** | **Specification** |
|---|---|
| Processor | 13th, 8th Generation 8100 processor. |
| RAM | 4 GB, DDR4 expandable upto 32 GB |
| Hard Drive Disk | 1000 GB SATA |
| Certificates | Energy Star, BIS, ROHS |
| Security | TPM 2.0 |
| Operating System | Linux |
| Warranty | 5 years on site |
| Chipset | OEM Compatible |
| USB | 4: 2.0 & 2: 3.0 |

३. संगणक सामुग्री खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २४.०८.२०१७ नुसार विहित तरतुदींचा अवलंब करुन करण्यात यावी.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००) (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) या लेखाशिर्षाखाली "१७ संगणक खर्च" या उदिष्टांतर्गत खर्च भागविण्यात येईल. निधी वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

५. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०२०२१०४८४२९५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2019.02.02 10:54:40 +05'30'

**( अ. शा. कलोती )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,

२) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,

३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,

४) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,

५) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

७) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

१०) लेखा अधिकारी, मुंबई ,

११) सह सचिव, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२) निवड नस्ती.